**सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण व परीक्षा सन २०१७ साठी अर्ज मागविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप २०१७/प्र.क्र.११/का.१७

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०५ एप्रिल, २०१७.

**शासन परिपत्रक-**

महाराष्ट्र शासन दुय्यम मंत्रालय सेवा (सहायक) सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा नियम, १९७७ मधील तरतूदीनुसार सन २०१७ मध्ये आयोजित करावयाच्या प्रशिक्षण आणि परीक्षेसाठी प्रथमच बसण्यास पात्र असलेल्या उमेदवारांचे विहित नमुन्यातील अर्ज या परिपत्रकान्वये मागविण्यात येत आहेत.

२. उपरोक्त सहायक सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा नियमातील नियम ३ नुसार खालील सहायक कक्ष अधिकारी सदरहू प्रशिक्षणाचा लाभ घेवून सन २०१७ च्या परीक्षेला बसू शकतात:-

अ) महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत ज्यांची सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती झाली आहे.
ब) मर्यादीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण होऊन ज्यांची नियुक्ती झाली आहे.
क) निम्न पदावरुन ज्यांना सहायक कक्ष अधिकारी पदावर नियमित पदोन्नती देण्यात आली आहे.

३. वरीलप्रमाणे पात्र असणाऱ्या सहायक कक्ष अधिकाऱ्यांचे विहित नमुन्यातील अर्ज, प्रशासकीय विभागाच्या आस्थापना अधिकाऱ्यांनी प्रमाणित करुन, दि. ०४ मे, २०१७ पर्यंत सामान्य प्रशासन विभागाकडे सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कार्यालय यांनी पाठवावेत.

४. सदरहू परीक्षा नियमातील नियम १४ नुसार पात्र सहायक कक्ष अधिकाऱ्यांना प्रशिक्षण वर्गाचा लाभ फक्त एकदाच घेता येतो. त्यामुळे ज्या सहायक कक्ष अधिकाऱ्यांनी यापूर्वी सदर प्रशिक्षणाचा लाभ घेतला आहे त्यांना पुन्हा प्रशिक्षणाचा लाभ घेता येणार नाही. जे सहायक कक्ष अधिकारी यापूर्वी सहायक सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेत अनुत्तीर्ण झाले आहेत तसेच जे सहायक कक्ष अधिकारी सदर परीक्षेला अनुपस्थित राहिले आहेत त्या सहायक कक्ष अधिकाऱ्यांचे सन २०१७ मधील सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेस बसण्यासाठीचे अर्ज, उपरोक्त नमूद प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर स्वतंत्रपणे मागविण्यात येतील त्यावेळी ते पाठविण्यात यावेत.

५. सदर परिपत्रक सर्व संबंधित सहायक कक्ष अधिकाऱ्यांच्या (प्रतिनियुक्तीवर/रजेवर असलेल्या सहायक कक्ष अधिकाऱ्यांसह) कृपया त्वरित निदर्शनास आणावे व त्यांची स्वाक्षरी घेऊन ते कागदपत्र आपल्या अभिलेखात जतन करुन ठेवावेत. संबंधित सहायक कक्ष अधिकाऱ्यांची नियुक्ती नियमित असल्याची आस्थापना अधिकाऱ्यांनी खात्री करावी. या संदर्भात काही त्रूटी राहिल्यास त्याची संपूर्ण जबाबदार संबंधित आस्थापना अधिकाऱ्यांची राहील याची कृपया नोंद घेण्यात यावी.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०४०५१६२००६७३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok D Bhawar

Digitally signed by Ashok D Bhawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=889194f9dc0d33cf371e0c5894ba7eb11af93d7eb91047cde855f6cea48479ec, serialNumber=a5b971e0d66fa6d25553669ec4c46d80f1a7679479035f99c2d14d7244aad1f6, cn=Ashok D Bhawar
Date: 2017.04.05 16:21:38 +05'30'

**( अ.धों.भवार )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,(पत्राने)
२. सर्व मंत्रालयीन विभाग ( आस्थापना )
३. निवडनस्ती